## आजरें–प्रकरण

आजरे प्रकरण अजून सपलेले नाही. कोल्हापूर सरकाराने कमिशन बसवून निकाल दिला, पण प्रसिद्ध झालेल्या हकीकतीवरून दिसते की इचलकरजीकराचे अपील होत आहे अर्थात् प्रकरण चालू असल्यामुळे मूळ हकीकत अजून टिकून आहे असे समजावयास हरकत नाही

इचलकरजी सस्थानपैकी आजरे गावी तेथील कबरस्तान व इदगा याचे आसपास सस्थानचे हद्दीत मुसलमानानी पिंपरणीची नवीन झाडें गेल्या वर्षी लावली, त्याचा पचनामा करण्याकरिता इचलकरजीचे पाटील–कुलकर्णी ता १४ १२–३४ रोजी गेले असता मुसलमानानी त्यास हरकत केली, व आजऱ्याचे मामलेदाराचे घरी जाऊन दगामस्ती केली, व त्याचा हेतु मामलेदारावर हल्ला करण्याचा होता पण सुदैवाने मामलेदार परगावी होते व हा प्रकार कळताच ते परस्पर इचलकरजीस गेले पुढे इचलकरजीचे अॅडमिनिस्ट्रेटर ले. क फिरअर व कोल्हापूरचे काही अधिकारी यानी २१ डिसेबर रोजी मुसलमानाची समजूत घातली व दुसऱ्या दिवशी पचनामा झाला पुढे ता ८ जानेवारी १९३५ रोजी इचलकरजीचे कारभारी, दोन मजिस्ट्रेट व आजऱ्याचे मामलेदार सशस्त्र पोलिसासह ता १४ डिसेबर रोजी पचनाम्यास हरकत करून दगा करणाऱ्या मुसलमानाना पकडण्याकरिता गेले गावाचे बाहेरील एका मुसल- हॉटेलवाल्यास पकडल्याचे गावात कळताच सुमारे दोनशे मुसलमान सायुध पुरुष, स्त्रिया व मुले याचा जमाव अमलदाराना आड आला त्याना अधिकाऱ्यानी सामोपचाराच्या गोष्टी सागून आरोपीना पकडण्याच्या आड न येण्याविषयी सागितले पण मुसलमानानी ते ऐकले नाही. उलट शिवीगाळ करून दग्याची भाषा करू लागले त्यामूळे अधिकाऱ्यानी सुरुवातीस फुसक्या गोळ्या झाडल्या, तरीही मुसलमान ऐकेनात, उलट दगडझोक करू लागले, अधिकाऱ्यांस मार बसू लागला, तेव्हा गोळीबार केल्याशिवाय लोक पागणार नाहीत असे पाहून अधिकाऱ्यानी पोलिसाकडून अकरा फैरीत ६६ गोळ्या झाडविल्या त्यामुळें एकूण ११ मुसलमान मेले व वीसबावीस जखमी झाले मुसलमान जमावाची पागापाग झाली व भयकर दगा टळला. इचलकरजीच्या अमलदारानी मृताचे दफन करविले व जखमी झालेल्याना दवाखान्यात पोचविले दुसरे दिवशी कोल्हापुराचे दिवाण तेथें येऊन मुसलमानाचे इच्छेप्रमाणे जखमी मुसलमानास त्यानी कोल्हापुरास नेवविले पुढे कोल्हापुर दरबारने नेमलेल्या कोल्हापुरचे दिवाण व कर्नल रसेल याच्या कमिटीच्या सदर प्रकरणाबाबतच्या रिपोर्टप्रमाणे सदर प्रकरणात सबध असलेले इचलकरजीचे काही अधिकारी काढण्यात येऊन, व मृत व जखमी मुसलमानास नुकसानभरपाई व पोटगी वगैरे देण्याचा हुकूम कोल्हापुर दरबारकडून झाला ह्या प्रकरणात आजऱ्याच्या मुसलमानाना कोल्हापुराकडून फूस होती असे म्हणतात कोल्हापुरच्या निकालाविरुद्ध इचलकरजीच्या अॅडमिनिस्ट्रेटरानी स्वतत्रपणे दक्षिणी सस्थानच्या एजटमार्फत हिं सरकारकडे रिपोर्ट केला आहे असे कळते

---

## कराची येथे मुसलमानांचा दंगा

पडित नथूराम यानी महमद पैगबरासबधाने आक्षेप्य मजकूर लिहिला या आरोपावरून त्याजवर खटला झाला त्यात त्याना शिक्षा झाली जामिनावर खुले होऊन त्यानी अपील केले या अपिलाच्या कामासाठी ते कोर्टात बसले असता व कोर्टात शेकडो लोक वावरत असता अबदुल क्वायम या नांवाच्या एका मुसलमानाने त्याच्यावर अनवस्था हल्ला केला व त्यास भोसकून ठार केले आपण हे एक मोठें धार्मिक महत्कृत्य केले असा त्याचा समज झाला क्वायमला फाशीची शिक्षा झाली व बरीच भवति–न–भवति होऊन त्यास फाशी देण्यात आले त्याचा दफनविधि झाल्यावर त्याच्या प्रेतदर्शनासाठी मुसलमानाच्या झुंडीच्या झुंडी लोटू लागल्या. त्या

प्रेताची मिरवणूक काढण्याचाही त्यांनी आग्रह धरला हा प्रकार होऊ दिला असता तर कराची शहरात प्रळयच झाला असता सरकारी अधिकाऱ्याचे असे मत पडल्यामुळें त्यांनीं, हा मुसलमान समाजाचा आग्रह मोडावा म्हणून, गर्दी मोडण्याचे काम सुरू केले मुसलमान लोक बेताल होऊन पोलिसावर गर्दी करू लागले व अधिकारी लोकाना मार बसू लागला त्याबरोबर पोलिसानी फैरी झाडल्या व दीडदोनशे मुसलमान मरण पावले. हा गोळीबार विनाकारण झाला व म्हणून अधिकाऱ्याची चौकशी व्हावी असा हट्ट पुष्कळानीं धरला व शौकतअल्लीनी तर कमिटी नेमून स्वतंत्र चवकशी करण्यासही कंबर बांधली पार्लमेंटपर्यंत हे लोण पोहोचले पण सरकारने ' झाले आहे ते बरोबरच न्याय्य झाले आहे ' असे निकालाचे सांगून टाकले व स्वतंत्र कमिटीला चौकशीचा कसलाही अधिकार नाहीं असे मुसलमानास बजाविले शौकतअल्ली याना कराचीकडे फिरकण्यासही सध्या प्रतिबंध आहे.

---

## लाहोरचें शीख-मुसलमान भांडण

लाहोरच्या शीख मुसलमानाच्या वितुष्टाची हकीगत सर्वप्रसिद्ध आहे शाहीदगंज गुरुद्वाराच्या आवारात जी मशिद होती ती शिखानी पाडून टाकली यामुळें तेथे मुसलमानाचा मोठाच दंगा झाला वास्तविक या इमारतीवर आज दीड-पावणेदोनशें वर्षें शीखांचाच हक्क आहे व तो पुन्हा पुन्हा कायद्याने शाबित झाला आहे तथापि मुसलमानानी मोठाच दंगा केला पोलिसानी गोळीबार करून दंगेखोराना पिटाळून लावले गोळीबाराने बरेच मुसलमान मेल्यामुळे त्या समाजांत मोठाच क्षोभ झाला व असे दिसू लागले की या ज्वाळा पंजाबात पसरत जाणार पण इतक्यात मुसलमानी धर्माच्या पुढाऱ्यांनी आपला फतवा काढून दंग्याची उचल करणाराना अगदी मूर्ख ठरविले उलेमांच्या मते "या मशिदीसाठी मुसलमानानी ही जी चळवळ सुरू केली व जिच्यापायी इतके मुडदे पडले तिला कसलाहि आधार नाही ही मशीद 'मशिद' नाहींच पूर्वी कधी असली तर इतकी वर्षे ती शिखांच्या ताब्यात राहिल्यामुळे अपवित्र बनली आहे व म्हणून तिच्यासाठी मुसलमानानी इतका हमामा करण्याचे कारण नाही " या फतव्यामुळें मुसलमान समाजाला दंगा करावयास जे एक निमित्त सापडले होते ते त्याच्या हातून अचानक गेले व त्यास तोंडघशी पडल्यासारखे झाले मुसलमानाची समजूत काढण्यासाठी सरकारने त्याना एक सरकारी इमारत, की जेथे पूर्वी मशिद होती, ती देऊ केली होती ! पण आता उलेमानीच हे मुसलमानाचे भांडण अगदी खोटे आहे असे जाहीर केल्यामुळे सरकारलाही फसल्यासारखे झाले असेल !

---